**राज्यात वस्त्रोद्योगाच्या वाढीसाठी उपाययोजना सूचविण्यासाठी श्री. सुरेश हाळवणकर ,वि.स.स. यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्र. धोरण २०१४/प्र.क्र. २६३ /टेक्स-५,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक - **१३** नोव्हेंबर, २०१४

**प्रस्तावना -**

राज्याच्या आर्थिक संरचनेमध्ये वस्त्रोद्योग क्षेत्राची अत्यंत महत्वाची भूमिका आहे. शेती व्यवसायानंतर वस्त्रोद्योग हा राज्यातील महत्वाचा उद्योग आहे. कृषि व्यवसायानंतर या उद्योगामध्ये जास्तीत जास्त रोजगार निर्माण करण्याची क्षमता आहे. ही बाब विचारात घेऊन राज्य शासनाने महाराष्ट्र राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०११-१७ जाहीर केले आहे. राज्याच्या वस्त्रोद्योग धोरणाचा आढावा घेऊन कापूस ते तयार वस्त्रनिर्मिती हे उद्दिष्ट समोर ठेऊन राज्यातील वस्त्रोद्योगापुढील समस्यांचा आढावा घेऊन वस्त्रोद्योगाचा विकास करण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना सूचविण्यासाठी समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राज्याच्या वस्त्रोद्योग धोरणाचा आढावा घेऊन कापूस ते तयार वस्त्रनिर्मिती हे उद्दिष्ट समोर ठेऊन राज्यात वस्त्रोद्योगाचा विकास करण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना सूचविण्यासाठी श्री. सुरेश हाळवणकर, वि.स.स. यांच्या अध्यक्षतेखाली खालील सदस्य समाविष्ट असलेली समिती नियुक्ती करण्यास शासन मान्यता देत आहे.

समितीचे सदस्य : -

या समितीचे सदस्य खालीलप्रमाणे असतील:-

१. उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, सदस्य सचिव
२. सचिव (उद्योग) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांनी नियुक्त केलेले प्रतिनिधी
३. सचिव(ऊर्जा ) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांनी नियुक्त केलेले प्रतिनिधी
४. सचिव (कामगार ) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांनी नियुक्त केलेले प्रतिनिधी
५. सचिव, वित्त विभाग यांनी नियुक्त केलेले प्रतिनिधी
६. सचिव ,पर्यावरण विभाग यांनी नियुक्त केलेले प्रतिनिधी
७. सचिव ( सहकार) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग यांनी नियुक्त केलेले प्रतिनिधी
८. सह संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर

२. सदर समिती खालील बाबींचा अभ्यास करुन शासनास एकत्रित किंवा टप्प्याटप्प्याने अहवाल/ शिफारसी सादर करील. समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१) राज्याच्या वस्त्रोद्योग धोरणाचा आढावा घेऊन वस्त्रोद्योग धोरणाची फेररचना करण्याबाबत शिफारसी करणे.

२) राज्यात उत्पादीत होणाऱ्या सर्व कापसावर राज्यातच प्रक्रिया होईल यासाठी कापूस ते तयार वस्त्रनिर्मिती प्रकल्प उभारण्यासाठी उपाय योजना.
३) वस्त्रोद्योगाचे एकात्मिकीकरण करण्यासाठी उपाय योजना .
४) नवीन टेक्सटाईल पार्क, प्रोसेसिंग पार्क, स्पिनिग पार्क, टेक्सटाईल मेगासिटी, टेक्सटाईल हब स्थापन करण्यासाठी शिफारशी करणे.
५) यंत्रमागाचे आधुनिकीकरण करण्यासाठी उपाय योजना .
६) अस्तित्वातील यंत्रमाग सहकारी संस्थांचे बळकटीकरण करण्यासाठी उपाय योजना
७) राष्ट्रीय सहकारी विकास निगम पुरस्कृत यंत्रमाग सहकारी संस्थाना अर्थसहाय्य देण्याच्या योजनेचा आढावा घेऊन उपाय योजना .
८) यंत्रमाग संजिवनी योजनेचा आढावा घेऊन उपाय योजना.
९) वस्त्रोद्योगासाठी कामगार कौशल्य विकास योजना.
१०) वस्त्र निर्यात करण्यासाठी उपाय योजना
११) वस्त्रोद्योगात थेट परकीय गुंतवणूक आणण्यासाठी उपाय योजना.
१२) हातमाग उद्योगाचे बळकटीकरण करण्यासाठी उपाय योजना.
१३) वस्त्रोद्योगासाठी कामगार कायद्यात सुधारणा.
१४) यंत्रमाग कामगारांचे कल्याण मंडळ कार्यक्षम व परिणामकारक होण्यासाठी उपाययोजना.
१५) या शिवाय राज्यात वस्त्रोद्योगाचा विकास होण्यासाठी समितीला योग्य वाटतील अशा बाबींवर उपाययोजना.

३. समिती आवश्यकतेनुसार वस्त्रोद्योग क्षेत्रातील उद्योजक, तज्ञ व्यक्ती, वस्त्रोद्योग क्षेत्राशी संबंधित संघटना यांचेशी चर्चा करील व आवश्यकते नुसार समितीच्या बैठकीस निमंत्रित करील. या शिवाय समिती आवश्यक वाटेल अशा ठिकाणी अभ्यास दौरा आयोजित करील.

४. सदर समिती त्यांचा अहवाल दिनांक ३१ जानेवारी २०१५ पर्यंत सादर करील. समितीचे अध्यक्ष यांना वित विभागाच्या शासन निर्णय क्र. शासाऊ १०१०/प्र.क्र. ९६/१०/साऊ, दिनांक १३.३.२०१२ नुसार सेवा सुविधा उपलब्ध होतील.

५. या समितीसाठी होणारा खर्च २८५२ उद्योग -०८,ग्राहकोपयोगी वस्तू उद्योग,२०२, वस्त्र निर्माण"(०१)(०२) वस्त्रोद्योगाच्या वेगवेगळया घटकांचा / योजनांचा अभ्यास करणे, संशोधन करणे, पाहणी करणे (२८५२ ०५०५) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात येईल व विभागास उपलब्ध करुन दिलेल्या वित्तीय तरतूदीतून भागविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध्र करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१४१११३१४४३५९३९०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Rasik Ambadas Khadse

Digitally signed by Rasik Ambadas Khadse
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Co-operation marketing and textiles department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Rasik Ambadas Khadse
Date: 2014.11.13 14:51:51 +05'30'

( र. अं. खडसे )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

१) प्रत :

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
२) मा. मंत्री (सर्व)
३) मा. राज्यमंत्री (सर्व)
४) श्री. सुरेश हाळवणकर, वि.स.स. तथा समितीचे अध्यक्ष,
५) विधानसभा/विधानपरिषद सदस्य (सर्व)
६) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
७) अपर मुख्य सचिव, (वित्त)
८) अपर मुख्य सचिव (नियोजन)
९) अपर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१०) सर्व प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) संचालक, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
१२) समितीचे सदस्य सचिव व सर्व सदस्य.
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१५) महालेखापाल, (लेखा व लेखा अनुज्ञेयता/लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य १ /२, मुंबई, नागपूर
१६) निवड नस्ती (टेक्स-५)